**मा. राज्यपाल महोदयांच्या ताफ्याकरिता ४ नवीन वाहने खरेदी करण्यास मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्र. राजभ- २०२३/२९७/प्र.क्र.११३/राजभ,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०००३२
दिनांक : ०९ मे, २०२५

**संदर्भ:-** १) शासन ज्ञापन, सामान्य प्रशासन विभाग, क्र. संकीर्ण-११०९/प्र.क्र.३३८/१९/१९-अ, दि.२७.०९.२०११.
२) राजभवन, मुंबई कार्यालयाचे पत्र क्र. रापप्र/राअपप्र/अधिक्षक/गॅरेज/२०२३/१४७९, दि.३१.०५.२०२३
३) वित्त विभाग शासन निर्णय क्र. वाहन-२०२४/प्र.क्र.११/विनियम, दि. २.०२.२०२४

**प्रस्तावना :-**

मा. राज्यपालांचे परिवार प्रबंधक कार्यालयासाठी संदर्भाधीन १ च्या शासन ज्ञापनानुसार एकूण ८ वाहने मंजूर करण्यात आली आहेत. संदर्भाधीन २ येथील पत्रान्वये सध्या वापरात असलेल्या खालील ०४ वाहनांऐवजी ०४ नवीन वाहने खरेदी करण्याबाबत विनंती करण्यात आली होती.

१) एमएच-०१-एएन-५५६६ (Volkswagen Vento),
२) एमएच-०१-एएन-८८९९ (Skoda Superb),
३) एमएच-०१-एएन-२२३३ (Honda City) व
४) एमएच-०१-एएन- ३३४४ (Mahindra Bolero)

त्यानुसार मा.राज्यपालांचे परिवार प्रबंधक कार्यालयातील उपरोक्त चार वाहने निर्लेखित करण्याच्या अधीन राहून त्याऐवजी, Toyota Hycross VxO (Seater) (Petrol) (३ वाहने) व Toyota Camry CZ (Auto) BS६, २०२३ MFG HYBRID (Petrol) (१ वाहन) (**किंमत रु.१,३१,५१,१९५/-** अक्षरी- रु. एक कोटी एकतीस लक्ष एक्कावन्न हजार एकशे पंच्याण्णव फक्त) इतक्या किंमतीची एकूण ०४ नवीन वाहने मा.राज्यपालांच्या ताफ्यासाठी खरेदी करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

मा.राज्यपालांचे परिवार प्रबंधक कार्यालयातील सध्या वापरात असलेली /निर्लेखित करावयाची वाहने व नवीन खरेदी करावयाच्या वाहनांचा तपशिल खालीलप्रमाणे आहे.

| अ.क्र. | सध्या वापरात असलेली / निर्लेखित करावयाची वाहने | नवीन खरेदी करावयाची वाहने |
|---|---|---|
| १ | २ | ३ |
| १ | एमएच-०१-एएन-५५६६ (Volkswagen Vento) | Toyota Hycross VxO (Seater) (Petrol) **३ वाहने** |
| २ | एमएच-०१-एएन-८८९९ (Skoda Superb) | |
| ३ | एमएच-०१-एएन-२२३३ (Honda City) | Toyota Camry CZ (Auto) BS६, २०२३ MFG HYBRID (Petrol) **१ वाहन** |
| ४ | एमएच-०१-एएन- ३३४४ (Mahindra Bolero) | |

**२.** उपरोक्त तक्त्यातील स्तंभ २ येथे नमूद चारही वाहने निर्लेखित करण्याच्या अधीन राहून त्याऐवजी स्तंभ ३ येथील १) Toyota Hycross VxO (Seater) (Petrol) (३ वाहने) व २) Toyota Camry CZ (Auto) BS६, २०२३ MFG HYBRID (Petrol) (१ वाहन) **(किंमत रु.१,३१,५१,१९५/-** अक्षरी- रु.एक कोटी एकतीस लक्ष एक्कावन्न हजार एकशे पंच्याण्णव फक्त) अशी एकूण ०४ नवीन वाहने मा.राज्यपालांच्या ताफ्यासाठी खरेदी करण्यास पुढील अटींच्या अधीन राहून शासन मान्यता देण्यात येत आहे.

१. एमएच-०१-एबी-९६९६ व एमएच-०१-एएन-७७८८ या दोन वाहनांचे शासकीय परिवहन सेवा, वरळी, मुंबई यांचेकडे हस्तांतरण करावे.

२. नवीन वाहने उपलब्ध होताच मा.राज्यपाल महोदयांच्या परिवार प्रबंधक कार्यालयाकडील एमएच-०१-एएन-५५६६ (Volkswagen Vento), एमएच-०१-एएन-८८९९ (Skoda Superb), एमएच-०१-एएन-२२३३ (Honda City) व एमएच-०१-एएन- ३३४४ (Mahindra Bolero) ही चार वाहने निर्लेखित करणे व निर्लेखन आदेशाची प्रत वित्त विभागास सादर करणे आवश्यक राहील.

३. मा.राज्यपाल महोदयांच्या परिवार प्रबंधक कार्यालयाकरिता वाहन आढाव्यान्वये अनुज्ञेय वाहन संख्येच्या मर्यादेचे उल्लंघन होणार नाही याची जबाबदारी पूर्णतः परिवार प्रबंधकाची राहील.

४. निधी उपलब्ध असणे आवश्यक राहील.

५. विहित कार्यपध्दतीचा अवलंब करुन वाहन खरेदी करणे आवश्यक राहील.

**३.** सदर वाहन खरेदीचा खर्च "२०१२-राष्ट्रपती, उपराष्ट्रपती, राज्यपाल/संघराज्य क्षेत्राचे प्रशासक, १०३-परिवार आस्थापना (०१) (०१)) राज्यपालांचे परिवार प्रबंधक (२०१२ ००४१) ५१-मोटार वाहने" या लेखाशिर्षांतर्गत सन २०२५-२६ या आर्थिक वर्षासाठी मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा. तसेच या वाहनांच्या खरेदीकरीता अतिरिक्त निधी उपलब्धतेसाठी विहीत कार्यपध्दतीचा अवलंब करण्यात यावा.

**४.** सदर शासन निर्णय, वित्त विभागाच्या दि.१७.०४.२०१५ च्या शासन निर्णयानुसार वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ उप विभाग-२, अनुक्रमांक १९-ब, नियम क्रमांक ६९ अन्वये राज्यस्तरीय वाहन आढावा समितीस प्रदान करण्यात आलेल्या अधिकाराचा वापर करुन सदर समितीने दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे. सदर शासन निर्णय वित्त विभागाने त्यांच्या अनौपचारीक संदर्भ क्र. ०६-२०२५/विनियम, दि.१४.०२.२०२५ अन्वये दिलेल्या सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

**५.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२५०५०९१८२६५११०५२५०७ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

KRANTI BHIMRAO PATIL

Digitally signed by KRANTI BHIMRAO PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT,
2.5.4.20=82bdf2956da62b4fc2f658725d7587906d3cf8eb3117ad97f90ef418d0d39a41, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=4CB4EDEE9A9967B63A896631DCC4A6E70FF0378E5AF6387779BF67DE75ED5B49, cn=KRANTI BHIMRAO PATIL
Date: 2025.05.09 18:28:03 +05'30'

**(क्रांती पाटील)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२) मा.राज्यपालांचे परिवार प्रबंधक, राजभवन, मुंबई
३) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महराष्ट्र राज्य १ / २, मुंबई / नागपूर,
४) महालेखापाल (लेखापरीक्षा) महाराष्ट्र राज्य, १ / २, मुंबई / नागपूर,

५) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
६) निवासी लेखाधिकारी, मुंबई,
७) नियंत्रक, शासकीय परिवहन सेवा, वरळी, मुंबई
८) वित्त विभाग (व्यय-४, विनियम), मंत्रालय, मुंबई,
९) सामान्य प्रशासन विभाग / का.अर्थसं, का.आस्था-२, मंत्रालय, मुंबई,
१०) निवड नस्ती / राजभ, सा. प्र. वि., मंत्रालय, मुंबई.